**वय वर्षे ३ ते ६ या वयोगटातील बालकांना पूर्व प्राथमिक शिक्षण देणाऱ्या खाजगी केंद्रांच्या नोंदणीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : संकीर्ण-२०२५/प्र.क्र.१५१/एस.डी.४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २४ एप्रिल, २०२५

वाचा :-

१) राष्ट्रीय शिक्षण धोरण-२०२०
२) राज्य अभ्यासक्रम आराखडा (पायाभूत स्तर) २०२४

**शासन परिपत्रक :-**

राष्ट्रीय शिक्षण धोरण-२०२० अनुसार ५+३+३+४ आकृतीबंधातील पहिली ५ वर्षे म्हणजे पूर्व प्राथमिक शाळेची ३ वर्षे (वयोगट ३ ते ६) व इयत्ता १ ली आणि इयत्ता २ री (वयोगट ६ ते ८) यांचा समावेश आहे. या ५ वर्षाच्या टप्प्याला 'पायाभूत स्तर' असे संबोधण्यात आले आहे. राष्ट्रीय अभ्यासक्रम आराखडा पायाभूतस्तर (National Curriculum Framework - Foundation Stage - N C F F S) केंद्र शासनाने तयार केला असून त्यावर आधारित राज्य अभ्यासक्रम आराखडा पायाभूत स्तर (State Curriculum Framework - Foundation Stage - S C F F S) राज्याने तयार केला आहे.

**२.** राज्य अभ्यासक्रम आराखड्यामध्ये पुढील ध्येय स्पष्टपणे मांडण्यात आले आहे. "वय वर्ष ३ ते ८ वयोगटातील प्रत्येक बालकाला लवकरात लवकर मोफत, सुरक्षित, गुणवत्तापूर्ण आणि वैकल्पिकदृष्ट्या सुयोग्य वातावरण मिळवून देणारे प्रारंभिक बाल्यावस्था संगोपन आणि शिक्षण सहज उपलब्ध करुन देणे."

**३.** सद्यस्थितीत वय वर्ष ३ ते ६ वयोगटातील बालकांना अंगणवाड्या, बालवाड्या, शाळेला जोडून पूर्व प्राथमिक वर्ग व खाजगी पूर्व प्राथमिक वर्ग यामधून शिक्षण दिले जाते. शासकीय व स्थानिक स्वराज्य संस्थांच्या बालवाड्या व अंगणवाड्या यांची नोंदणी व माहिती महिला व बाल विकास विभाग यांचेकडे उपलब्ध आहे. तथापि खाजगी पूर्व प्राथमिक वर्गांची अधिकृत माहिती सद्यःस्थितीमध्ये शासनाकडे उपलब्ध नाही. वयोगट ३ ते ६ साठी पूर्व प्राथमिक शिक्षण देणाऱ्या सर्व खाजगी केंद्रांची

माहिती एकत्रित स्वरुपात राज्यस्तरावर, जिल्हास्तरावर तसेच पालकांनाही उपलब्ध असणे आवश्यक आहे. यासाठी वयोगट ३ ते ६ यांना शिक्षण देणारे केंद्र - Pre. School, Nursery, Jr. K.G., Sr. K. G., पूर्व प्राथमिक वर्ग अशा कोणत्याही नावाने सुरु असलेल्या, वयोगट ३ ते ६ मधील विद्यार्थ्यांना शिक्षण देणाऱ्या खाजगी केंद्रांची नोंदणी करण्यासाठी Pre School Registration पोर्टल शासनाकडून सुरु करण्यात आले आहे. यामध्ये ३ ते ६ वर्षे वयोगटातील विद्यार्थ्यांना पूर्व प्राथमिक शिक्षण देणाऱ्या खाजगी केंद्रांची सर्वसाधारण माहिती, व्यवस्थापनाची माहिती, विद्यार्थी संख्या, भौतिक सुविधा, कार्यरत शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी माहिती यांची नोंद पोर्टलवर करावयाची आहे.

**४.** पूर्व प्राथमिक शिक्षण देणाऱ्या खाजगी केंद्रांच्या नोंदणीची सुविधा education.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर Web Links मध्ये उपलब्ध असलेल्या Pre-School Registration Portal (ECCE) या टॅबवर उपलब्ध करुन देण्यात आलेली आहे. त्यामुळे ३ ते ६ वर्षे वयोगटातील बालकांना पूर्व प्राथमिक शिक्षण देणाऱ्या खाजगी केंद्रांनी या पोर्टलवर पुढील सात दिवसांच्या आत नोंदणी करणे बंधनकारक करण्यात येत आहे.

**५.** शिक्षण संचालक (प्राथमिक) यांनी यासंदर्भातील कार्यपूर्ती अहवाल शासनास सादर करावा.

**६.** सदर शासन परिपत्रक हे महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०२५०४२४११२९१९४२२१ असा आहे. हे शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORT DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2025.04.24 11:30:19 +05'30'

**(तुषार महाजन)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री (नगर विकास) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. उप मुख्यमंत्री (वित्त) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. सभापती, विधानपरिषद, महाराष्ट्र, मुंबई.
६. मा. अध्यक्ष, विधानसभा, महाराष्ट्र, मुंबई.

७. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, विधानमंडळ, मुंबई.
८. मा. मंत्री, शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. मा. मंत्री, महिला व बाल विकास विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०. सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
११. मा. राज्यमंत्री, शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१२. सर्व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१३. सर्व मा. विधानपरिषद/विधानसभा सदस्य, विधानमंडळ, मुंबई.
१४. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
१५. प्रधान सचिव (शालेय शिक्षण), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. आयुक्त (शिक्षण), शिक्षण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१७. विभागीय आयुक्त (सर्व).
१८. जिल्हाधिकारी (सर्व).
१९. आयुक्त, महानगरपालिका (सर्व).
२०. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व).
२१. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
२२.राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई.
२३.संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र, पुणे.
२४. संचालक, महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यास संशोधन मंडळ, बालभारती, पुणे
२५.शिक्षण संचालक (प्राथमिक) शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२६. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२७. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक.
२८. प्राचार्य, जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था (सर्व).
२९. सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक).
३०. निवडनस्ती (एसडी-४).